उप संचालक, आरोग्य सेवा,कोल्हापूर मंडळ,कोल्हापूर यांच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय, कामथे चिपळूण व ग्रामीण रुग्णालय,संगमेश्वर येथील ट्रामा केअर युनिटच्या एकूण १५ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे २०१८/प्र.क्र.१७४ /आरोग्य-३ अ**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई ४०० ००१
तारीख: २ जानेवारी, २०१९

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे २०१८/प्र.क्र.१७४/आरोग्य-३अ, दि. २ मे, २०१८
२) सहसंचालक,आरोग्य सेवा, (राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष-३ /टे-१२/ कोल्हापूर मंडळ,कोल्हापूर/अपदेमुदतवाढ/सन १८-१९/१०७८१/१८ दि.१०.१०.२०१८
३) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दि.७/९/२०१८

**शासन निर्णय-**

संदर्भाधिन क्र.१ येथील शासननिर्णयान्वये उप संचालक, आरोग्य सेवा,कोल्हापूर मंडळ,कोल्हापूर यांच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालये,कामथे चिपळूण व ग्रामीण रुग्णालय,संगमेश्वर येथील ट्रामा केअर युनिटच्या १५ अस्थायी पदांना दि.१/३/२०१८ ते दि.३०/९/२०१८ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती.

२. संदर्भाधीन क्र.२ येथील प्रस्तावास अनुसरुन सदर पदांना दि.१/१०/२०१८ ते दि.२८/२/२०१९ या कालावधीसाठी मुदवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर १५ अस्थायी पदाना शासन निर्णय वित्त विभाग क्र पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/आ.पु.क दि.७/९/२०१८ मधील अटीच्या अधीन राहून दिनांक १/१०/२०१८ ते दिनांक २८/२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खाली दर्शविण्यात आलेल्या लेखाशिर्षातून खर्ची टाकण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-१९ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागवण्यात यावा.

**मागणी क्रमांक आर-१**

२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०६- सार्वजनिक आरोग्य,
८००-इतर खर्च,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना
(०१) (४५) ट्रामा केअर युनिटची स्थापना,महाराष्ट्र आपत्कालीन सेवा प्रकल्प
(२२१० जी २९८) (अनिवार्य खर्च)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक ७ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०२१४३६२९५८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: CN = Rajendra Shamraoji Kaurte, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2019.01.02 15:59:48 +05'30'

**(रा.शा.कौरते )**

(अवर सचिव, महाराष्ट्र शासन)

प्रत,

१.आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय ग्रामीण अभियान, मुंबई.

२.संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

३.सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालय- राज्यस्तर), मुंबई

४.सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई

५.उपसंचालक, आरोग्य सेवा,कोल्हापूर मंडळ,कोल्हापूर

६.वैद्यकीय अधिक्षक,उपजिल्हा रुग्णालय,कामथे चिपळूण/ग्रामीण रुग्णालय,संगमेश्वर

७.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व लेखापरिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर

८.जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी/कोल्हापूर

९.वित्त विभाग (व्यय १३)/वित्तीय सुधारणा-१/आपुक/, मंत्रालय, मुंबई

१०.अवर सचिव/कक्ष अधिकारी (सेवा-२, सेवा-३, सेवा-५, अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

११.निवडनस्ती(आरोग्य-३अ)